**सेवा रुग्णालय कसबा बावडा, जि. कोल्हापूर येथील उद्वाहन (लिप्ट) व विस्तारीत इमारतीमधील फर्निचर कामाच्या अंदाजपत्रकास व आराखडयास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-२०१८/ प्र.क्र.३०७/ आरोग्य-४**

मंत्रालय, १० वा मजला, संकुल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.
तारीख: १६ नोंव्हेबर, २०१९.

**वाचा** :-

१) **सहसंचालक, आरोग्य सेवा (राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्र.संआसे/कक्ष-३/टे-६/उपजिरुकसबाबावडालिपट/१०८९५-९६/१८, दि.११.१०.२०१८.**

२) **सहसंचालक, आरोग्य सेवा (राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्र.संआसे/कक्ष-३/टे-६/उपजिरुकसबाबावडाफर्निचर/१०९२४-२५/१८, दि.१२.१०.२०१८.**

३) **वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम (भाग-२), दि.१७.०४.२०१५ व दि.२०.०९.२०१९.**

**प्रस्तावना** :-

सेवा रुग्णालय कसबा बावडा, जि. कोल्हापूर येथील उद्वाहन (लिफ्ट) कामाचे अंदापजत्रक उप अभियंता, कोल्हपूर विद्युत उपविभाग, कोल्हापूर यांनी तयार केले आहे व विस्तारित इमारतीमधील फर्निचरच्या कामाचे अंदाजपत्रक कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, कोल्हापूर यांनी तयार केले आहे. सदरील दोन्ही अंदाजपत्रक सन २०१७-२०१८ च्या दरसूचिवर आधारित असून एकूण रु.६५.४९ लाख इतक्या कामासाठी निधी उपलबध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यासंदर्भात पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय** :-

सेवा रुग्णालय कसबा बावडा, जि. कोल्हापूर येथील उद्वाहन (लिप्ट) व विस्तारीत इमारतीमधील फर्निचर कामाच्या रु.६५.४९ लाख (पासष्ट लाख एकोण पन्नास हजार फक्त) अंदाजपत्रक व आराखडयास खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

१) अंदाजपत्रक व आराखडयास मुख्य अभियंता यांची मान्यता घेण्यात यावी.

२) अंदाजपत्रकात प्रचलित दरानुसार जी. एस. टी. ची आकारणी करावी.

२. सदर कामावरील खर्च मागणी क्र.एच.८, मुख्य लेखाशिर्ष, "४२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१ - नागरी आरोग्य सेवा (वैद्यकिय सहाय्य), ११० - रुग्णालये व दवाखाने, (१)(अ) - पंचवार्षिक योजनातंर्गत योजना - इमारती, (००)(०१) - मोठी बांधकामे (४२१० ००१४), ५३ - मोठी बांधकामे" या लेखाशिर्षाखालील सन २०१९-२० या वर्षाच्या उपलब्ध अनुदानामधून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौ.सं.क्र.२४३/१९/इमा-२, दि.०४.०६.२०१९ आणि वित्त विभागाच्या शासन निर्णक क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५ व दि.२०.०९.२०१९ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग- पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक १ येथील परिच्छेद क्र.१३४ अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१०१०१८१३२७६०१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradip M Balkavde

Digitally signed by Pradip M Balkavde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8db6aab31faca2f1a89698a28c94703436c07cda664672d20607766dc59d345b, serialNumber=ed0fa40788bb5c0d7f76b869fa2e5835af215c6a80eae8f70eaf87b0cf68d63f, cn=Pradip M Balkavde
Date: 2019.11.16 17:56:44 +05'30'

**प्र मो बलकवडे**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक, आरोग्य सेवा-१, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा-२, आरोग्य सेवा संचालनालय, पुणे.
५. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई.
६. सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई.
७. उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर.
८. सहाय्यक संचालक (लेखा व प्रशासन), आरोग्य सेवा, मुंबई.
९. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रूग्णालय, कोल्हापूर.

१०.जिल्हा आरोग्य अधिकारी, कोल्हापूर.

११.जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर.

१२. वित्त विभाग (कार्यासन-विनियम) / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

१३. अवर सचिव (अर्थसंकल्प), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.

१४. निवडनस्ती ( आरोग्य-४ ), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.